राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या ( NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, सन २०१८-१९ मध्ये राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) अंतर्गत आत्मा कार्यक्रम कृषि आयुक्तालय स्तरावर राबविण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८/प्र.क्र.१९५/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक:- ०१ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा -</u>

१) केंद्र शासनाच्या आत्मा अंतर्गत मार्गदर्शक सूचना सन २०१४
२) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफनं.३६-२८/२०१७- अेई, विस्तार कक्ष, दि.१५.६.२०१८ ची तीन पत्रे
३) संचालक आत्मा यांचे पत्र क्र.आत्मा/ प्र.क्र.०३-१८/लेखा /निवि/६६३/२०१८, दि.२५.६.२०१८
४) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/ प्र.क्र.९०/३-अे, दि. १९.७.२०१८
५) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/ प्र.क्र.१४२/३-अे, दि. ३०.८.२०१८
६) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/ प्र.क्र.१४१/३-अे, दि. १७.९.२०१८

<u>प्रस्तावना -</u>

सन २०१८-१९ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रु. ११३८२.६८ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता तसेच सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. १६६४.११ लक्ष निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता तसेच, त्या समरुप राज्य हिश्याचा निधी जिल्हा नियोजन व विकास समिती (DPDC) निधीतून उपलब्ध करुन घेण्यास संदर्भाधीन दि.१९ जुलै,२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. २०९.८१ लक्ष निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता तसेच, त्या समरुप राज्य हिश्याचा निधी जिल्हा नियोजन व विकास समिती (DPDC) निधीतून उपलब्ध करुन घेण्यास संदर्भाधीन दि.३० ऑगस्ट,२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. १२५.४७ लक्ष निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता तसेच, त्या समरुप राज्य हिश्याचा निधी जिल्हा नियोजन व विकास समिती (DPDC) निधीतून उपलब्ध करुन घेण्यास संदर्भाधीन दि. १७ सप्टेंबर,२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी पहिल्या हप्त्यात वितरीत केलेल्या रु.२०५६.९९ लक्ष निधीपैकी कृषि आयुक्तालय स्तरावर

एकुण केंद्र हिस्सा (६० %) रक्कम रु.७५.०० लक्ष आहरित केली असून त्यानुषंगाने राज्य हिस्सा (४०%) रक्कम रु.५० लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्याबाबतची विनंती संचालक,आत्मा यांनी संदर्भाधीन दि. २५.६.२०१८ च्या पत्रान्वये केली आहे. सन २०१८-१९ चा आत्मा कार्यक्रम कृषि आयुक्तालय स्तरावर राबविण्यासाठी चालू आर्थिक वर्षासाठी रु. ५० लक्ष इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सबब २०१८-१९ चा आत्मा कार्यक्रम कृषि आयुक्तालय स्तरावर राबविण्यासाठी रु. ५० लक्ष इतकी तरतूद वितरीत करणे आवश्यक आहे. तदनूसार शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** -

१ सन २०१७-१८ चा आत्मा कार्यक्रम कृषि आयुक्तालय स्तरावर राबविण्यासाठी राज्य हिश्याचा (४०%) निधी म्हणजेच रु.५०.०० लक्ष ( अक्षरी पन्नास लक्ष फ़क्त) एवढा निधी मागणी क्र. डी-३, २४०१,पीक संवर्धन,१०९ विस्तार व प्रशिक्षण, (०१) (४४) राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करिता सहाय्य उप अभियान ( राज्य हिस्सा ४० %) (२४०१ ४४३६) या लेखाशिर्षाखाली कृषि आयुक्त कार्यालयास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहेत.

२ याव्यतिरीक्त, आत्मा कार्यक्रम २०१८-१९ अंमलबजावणी / निधी विनियोगासंदर्भात संदर्भाधीन दि.१९.७.२०१८ , दि.३०.८.२०१८ व दि.१७.९.२०१८ अन्वये निर्गमीत करण्यात आलेले अन्य आदेश /सूचना कायम असतील.

३ सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील अटींची पुर्तता करुन सदर परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११६४७०७८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2018.11.01 16:49:44 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति** -

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त,(कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
५) संचालक ( आत्मा ),कृषि आयुक्तालय,पुणे.
६) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) संचालक वनामती, नागपूर

९) उप संचालक , आत्मा सामेती, पुणे
१०) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
११) महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१३) वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय) ,मंत्रालय,मुंबई.३२
१४) नियोजन विभाग, कार्यासन १४१४, १४३१, मंत्रालय,मुंबई.३२
१५) कार्यासन अधिकारी,२-अे, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६) निवड नस्ती (कार्यासन-३अे).